**जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदल्यात नवीन वाहन खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः वाहन-२०२२/प्र.क्र.१३६/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २९ जून, २०२४.

**संदर्भ:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.जेपीएस-२०१४/प्र.क्र.१०/ई-८, दि.२०/०५/२०१७.

२) वित्त विभाग,शासन निर्णय, क्र.वाहन-२०२४/प्र.क्र.११/विनियम, दि.०२/०२/२०२४.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८, दि.२७/०६/२०२२.

४) नियोजन विभाग, शासन ज्ञापन, क्र.डिपीए-०२२/प्र.क्र.१३९/का.१४८१,दि.१६/०१/२०२३.

५) उपआयुक्त ( सा.प्र.) विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक यांचे पत्र क्रमांक अभिलेख/ कावि/१४/२०२४, दि.२३/०१/२०२४ व दि.०१/०२/२०२४.

**प्रस्तावना :-**

नाशिक महसूल विभागातील "२०५३- जिल्हा प्रशासन" या लेखाशिर्षाखाली वेतन आहरित करणाऱ्या ९७ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.२०/०५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. विभागीय आयुक्त, कार्यालय,नाशिक यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र.०५ अन्वये जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या जुन्या निर्लेखित केलेल्या वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजुरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

नाशिक महसूल विभागातील जिल्हाधिकारी, नाशिक यांचे वाहन क्रमांक एमएच-१५-ईए-०३०३ (स्कोडा रॅपिड कार) या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास रुपये ९.०० लक्ष ( अक्षरी रुपये नऊ लक्ष फक्त ) इतक्या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे-

१. निधी उपलब्धतेनुसार शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०२४/प्र.क्र.११/ विनियम, दिनांक ०२/०२/२०२४ च्या शासन निर्णयामधील तरतुदीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांच्या वाहनाकरीता रुपये ९.०० लक्ष इतकी मर्यादा ठरविण्यात आली आहे. **निश्चित करण्यात आलेल्या वाहन किंमत मर्यादेत वस्तु व सेवा कराचा अंतर्भाव करण्यात आलेला नाही.** तथापि, सदर किंमतीमध्ये वाहनांच्या किंमतीसोबत टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस व सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादीसाठीच्या खर्चाचा

अंतर्भाव करण्यात आलेला आहे. निधी उपलब्धतेच्या व विहित कार्यपध्दतीच्या अवलंब करुन वाहन खरेदी करण्यात यावी.

२. शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४,दिनांक ०१/१२/२०१६ व क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४,दिनांक २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३. वाहन क्रमांक एमएच-१५-ईए-०३०३ (स्कोडा रॅपिड कार) या निर्लेखित शासकीय वाहनाच्या बदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी करण्यात आले नाही, या धारणेच्या अधिन राहून तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाहनासाठी येणारा खर्च हा सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८, दि.२७/०६/२०२२ अन्वये जिल्हा वार्षिक योजनेतर्गत "गतिमान प्रशासन तथा आपात्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण" या योजनेच्या माध्यमातून नियोजन विभागाने नाशिक जिल्हयास उपलब्ध करुन दिलेल्या "मागणी क्र.ओ-३६, लेखाशीर्ष (२०५३ ए २८९)-५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री" या लेखाशीर्षातर्गत उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१४/२०२४/व्यय-९, दिनांक १७/०५/२०२४ व अनौपचारीक संदर्भ क्र.२१५/२०२४/विनियम,दि.१०/०६/२०२४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०११७३६०७४३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR

Digitally signed by SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=bc3e3742bf263c80937ab54c636ad8936561711 77467ba8656a12c226f3029a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C55205CA6D1113BFAEC735BD2D1C5326D6B007C5CD3A46A6E4C4857E58AD2AFE, cn=SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
Date: 2024.07.01 17:47:42 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. अ.मु.स. (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई-३२
२. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग,नाशिक.
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर.
४. जिल्हाधिकारी, नाशिक.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम),मंत्रालय, मुंबई-३२.
७. निवड नस्ती ( कार्यासन ई-८ ),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.